# स्थलनामकोश



हे पुस्तक

## बाळकृष्ण बाबजी करकरे

व

## गोपाळ बाळकृष्ण वैद्य

ह्यानी केले

त

जावजी दादाजी

च्या "निर्णयसागर" छापखान्याचे मालक तुकाराम

जावजी ह्यानी छापून प्रसिद्ध केले.

माहे जानेवारी सन १८९६.



किमत १४ आणे.

# अभिप्राय.



ह्या स्थलनामकोशावर ज्या विद्वान् गृहस्थाकडून सूचना व अभिप्राय आले होते, त्यांपैकी बहुतेक सूचनांचा कोशात उपयोग केला असून अभिप्रायाचा गोषवारा यापुढ दिला आहे.

"असा ग्रंथ मराठींत नाहीं तो हवा आहे."

नाशिक ता. **नि. वि. छत्रे,**
१७।६।९३ डे. ए. इ. नाशिक.

"सदरहु पुस्तक फार उपयोगी होईल"

बेळगाव ता. **रामचंद्र भिकाजी गुंजीकर,**
१७।६।९३. फ. अ. टे. ए. इ. बेळगाव

"सदरहु पुस्तक फार उपयोगी होईल. यांत जरूर ती माहिती दिली आहे."

पुणे ता. **आबाजी विष्णु काथवटे,**
१८।१।९३ प्रोफेसर डे. कालेज.

"पुस्तकाचा नमुना पाहिला. आपला उद्योग स्तुत्य आहे. अशा प्रकारचे पुस्तक मराठीत अद्याप झालें नाही, व ते

अवश्य पाहिजे. ही उणीव आपण दूर करीत आहा, हे योग्य आहे."

नाशिक ता **द्वारकानाथ राघोबा तर्खडकर,**
१९।१।९३ हेडमास्तर हायस्कूल, नाशिक.

"एका पृष्ठावरून पुस्तकाबद्दल अभिप्राय देता येत नाही, तथापि पाठविलेल्या नमुन्यावरून पुस्तक उपयोगी पडेल असे वाटते, अशा पुस्तकाची आवश्यकता मराठी वाचकास फार आहे. कारण, अशा प्रकारचे पुस्तक मराठी भाषेत मुळीच नाही. मराठी शाळास उपयोगी पडेल"

पुणे ता. **विष्णु बाळकृष्ण सोहोनी,**
२१।६।९३ माजी प्रिन्सिपाल, पुणे टेनिंग कालेज.

"अशा प्रकारचे पुस्तक आपल्या भाषेत बहुतेक अगदी नवीन असून कर्त्याचा उद्देश फार स्तुत्य आहे, व पुस्तक उपयोगी झाल्यावाचून राहणार नाही"

पुणे ता. **हरि कृष्ण दामले,**
२५।६।९३ न्यू. इ. स्कूल, पुणे.

"स्थलनामकोश पुस्तकाचे एक पान पाठविलेले वाचून पाहिले. आपला यत्न फार स्तुत्य आहे. आणि अशा प्रकारच्या कोशाची फार जरूर आहे. मला आपला उद्योग फार

आवडला. अद्यापपर्यंत असा कोश कोणी केला नाही आपण करीत आहा."

रायपूर ता. **वामन दाजी ओक,**

२६।६।९३. हेडमास्तर हायस्कूल, रायपुर

"स्थलनामकोशाचा मासला पाहिला. अशा प्रकारचा ग्रंथ मराठीत नाही, त्याची पूर्तता करण्याचे आपण मनांत आणिले ही गोष्ट चांगली आहे."

ठाणे ता **रामचंद्र व्यंकटेश गद्रे,**

२६।६।९३ डे ए. इन्स्पेक्टर, जि. ठाणे

"नमुन्याचे पृष्ठ पाहिले. फार चांगले आहे. असे पुस्तक मराठीत पाहिजे आहे त्याचा उपयोग विद्यार्थ्यांस, शिक्षकांस आणि इतर जनांसही पुष्कळ होईल, असे मला वाटते"

नाशिक, **विनायक कोंडदेव ओक,**

जून १८९३. फ. अ डे. ए. इन्स्पेक्टर, नाशिक.

# प्रस्तावना.



आज वीस पचवीस वर्षांत अनेक विषयावर अनेक प्रकारचे चागले चागले ग्रंथ होऊं लागले आहेत हे देशाचे ऊर्जितावस्थेचे एक सुचिन्ह आहे जे जे लोक ह्या चागल्या कामी आपला अमोलिक वेळ खर्चीत आहेत, ते ते ह्या जगावर मोठे उपकार करीत आहेत, असें ह्मटले पाहिजे

ह्या उद्योगी लोकांच्या कृति पाहून, ज्यास थोडेबहुत ज्ञान आहे, त्यास ह्याबद्दल मोठे कौतुक व नवल वाटते, व त्यापैकी कित्येकास आपण आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणे, अल्प का होईना, पण देशाची चाकरी करून त्याच्या शेवटची तरी पायरी मिळवावी, अशी ईर्षा उत्पन्न होणे साहजिक आहे ह्या नियमावरून आपल्या हातून नवीन नाही, पण असलेल्याच विषयापैकी का होईना, अल्प सेवा करावी, असे मनात घोळत असे त्यात देवयोगाने असा सुयोग घडून आला की, आनकाल नावाजलेले प्रसिद्ध ग्रंथकार रा० रा० **विनायक कोंडदेव ओक** फ० डे० इ० नासिक, हल्ली पेनशनर, याचा येथे तीन चार वर्ष सहवास झाला पण आह्मी भाग्यहीन, आमच्या अंगी गुण नाही, सहवासाने

अगी गुण यावा, पण शरीरप्रकृतीच्या व वयाच्या मानानें तसा काही प्रकार झाला नाही. ह्याबद्दल अति वाईट वाटते

तरी एके दिवशी वरील विद्वान् गृहस्थाशी बोलत बसलो असता भूगोलाच्या स्थलाचा कोश आपल्या मराठीत नाही, तो कोणी केल्यास फार उपयोग होईल, असे उद्गार ऐकून मनात आले की, हे काम फार कठिण नाही, आपल्याच्याने सहज तडीस नेता येण्यासारखे आहे असा तेव्हाचे विचारावरून मनाचा निश्चय ठरून मी तो करितो असे त्यास ह्मटले. नतर 'पडल्या फळाची आज्ञा' ह्या ह्मणीप्रमाणे तोच सुदिन समजून भूगोलाची पुस्तके जवळ होती त्यावरून कामास सुरुवात तर केली आणखी पुस्तके मिळविण्याची तजवीज केली उभारीप्रमाणे तीन चार दिवस काम चालले पण मग एकीमागून एक अडचणी येऊ लागल्या, त्या अशा –एकच नाव दहा दहा वेळा येऊ लागले, व एकच गाव पण निराळ्या उच्चारानी लिहिलेले आढळू लागले, खरे उच्चार कोणते ह्याची इग्रेजी येत नसल्यामुळे अडचण येऊ लागली. उदाहरणार्थ एकप्रकार दाखवितो अनेदा ह्या शहराचे आनादा, आनदा असे तीन प्रकारचे उच्चार तीन पुस्तकात निराळ्या तऱ्हेने लिहिलेले आढळले, तेव्हा खरा उच्चार कोणता हें समजण्याची मारामार पडू लागली. सर्व पुस्तके

विद्वान् गृहस्थानी लिहिलेली आहेत, तेव्हा खरे कोणते मानावे ह्याचा निर्णय करणे कठिण झाले, ह्यामुळे जी पुस्तके जमविली होती त्यातील उच्चाराचा सारासार विचार करून लिहिण्याचा क्रम ठेविला आहे ह्याकरिता उच्चाराच्या सबधाने सुज्ञ लोक क्षमा करितील अशी आशा आहे

तसेच एकेका नावाची गावे, नद्या, बेटे वगैरे फार आढळली, त्या सर्वाचा ह्यात समावेश केला तर ग्रथविस्तार फार वाढेल, ह्याकरिता त्यापैकी एकएक दोन दोन प्रसिद्ध अशी घेतली आहेत तरी त्याची सख्या सुमारे आठ हजार झाली आहे

ह्या कोशात विल्हेवारीने नुसती शहरेच दिली आहेत असे नाहीं तर पृथ्वीच्या पृष्ठावरील सर्व भागाची विल्हेवारी लावून ह्यात त्याचा समावेश केला आहे

पृथ्वीवरील सर्वच भागाचा समावेश करणें ह्मणजे केवढा ग्रथ होईल व किती काल लागेल ह्याची कल्पना करणे अशक्य आहे, ह्मणून तें करूच नये असे मनात आणणे चुकीचे आहे, आपल्या शक्तीप्रमाणे थोडे का होईना पण करावे, पुढे ह्यापेक्षा अधिक करिता येईल, व मुळीच असा ग्रथ नाहीं, तो केल्यानें थोड्या अशाने तरी ती उणीव दूर होईल, ह्या हेतूने हे काम हाती घेऊन कसे तरी तडीस नेले आहे.

ह्या कोशास जिल्ह्याचे, इलाख्याचे, व पृथ्वीचे भूगोल ह्यांचे आधार घेतले आहेत हे ग्रंथ ज्यांनी ज्यांनी केले, त्यांचे त्यांचे आह्मी फार फार उपकार मानितो

ह्या कोशात पृथ्वीवरील बहुतेक मोठाली शहरे, नद्या, पर्वत, बंदरे इत्यादिकांचा संग्रह असून हिंदुस्थानातील त्यात विशेषेकरून मुंबई इलाख्यातील अधिक माहिती दिली आहे कोठे काय विशेष होते तेही ठिकठिकाणी दाखविले आहे

ह्या कोशाचा उपयोग पाहिला तर शाळांतून व वर्तमानपत्रे वाचताना अमुक ठिकाण कोठे आहे हे चटकर पाहाण्यास फार होईल इतकेंच नाही, तर ह्यात जी ऐतिहासिक व व्यापारोपयोगी माहिती दिली आहे, तीवरून वाचणारास अमुक ठिकाणी अमुक गोष्ट घडली व अमक्या ठिकाणी अमुक पदार्थ होतो हे कळून येईल.

आता हा कोश जसा पाहिजे तसा झाला नाही, हे मी कबूल करतो तरी दुसरी आवृत्ति काढण्याचा प्रसंग आल्यास त्या वेळी ह्यात राहिलेल्या गोष्टींची पूर्णता करीन असे आश्वासन देऊन ठेवितो तरी कृपा करून ज्याच्या ज्याच्या हाती हा कोश येईल, त्यांनी त्यांनी ह्यात काय सुधारणा केल्या पाहिजेत ह्या कळविल्या तर मी त्यांचा फार फार आभारी होईन व दुसऱ्या आवृत्तीचे वेळी त्यांचा योग्य उपयोग करीन.

ह्या सर्व अडचणी मी आपल्या मित्रास लिहिल्या व तशाच त्यानीही मला कळविल्या. तेव्हा उभयताचे विचारे हा कोश तयार केला आहे

ह्या कोशाच्या नमुन्याचे हटबिल काढून ते काही विद्वान् गृहस्थाकडेस पाठविले होते, ते त्यानी आपला अमोल्य वेळ खर्चून वाचून पाहून त्यावर अभिप्राय देऊन काही सूचनाही केल्या, याबद्दल मी त्याचा अत्यत आभारी आहे

नाशिक, ता }
११।१।९६ }

पु० कर्ते.

# ह्या कोशांतील संक्षिप्त शब्दांबद्दल सूचना.



अखा.—अखात.

अमे.—अमेरिका.

आफ्रि —आफ्रिका.

आशि —आशिया.

इ —इलाखा

इ स —इसवी सन.

इ —इग्लिश.

उ —उत्तर.

उ —उची

कि —किल्ला

खा —खाडी

ख —खड.

गुज —गुजराथ.

गा —गाव.

घा —घाट.

जि —जिल्हा.

ज्वा.पर्व.—ज्वालामुखीप.

डो —डोगर.

तला —तलाव.

ता —तालुका

द —दक्षिण.

दे —देश

न —नदी

प —पश्चिम

पर —परगणा

पर्व —पर्वत

पा —पासून

पासि —पासिफिक.

पू —पूर्व

पे —पेठा

प —पजाब

प्रदे —प्रदेश.

प्रा —प्रात

फू.—फूट.

| | |
|---|---|
| बे —बेट | वा —वायव्य. |
| ब —बगाल | श —शहर |
| (ब )—बदर | शिख —शिखर |
| म —मद्राम | म —सरोवर |
| म —मैल | ममु —समुद्र. |
| मु —मुबई | मा —सागर |
| यू —यूरोप | सामु —सामुद्रधुनी |
| रा —राजधानी, राज्यात | स —मस्थान |
| राज —रा ापुताना | हि —हिदुस्थान |
| ल —लढाई | क्षे —क्षेत्र |
| ल छा —ल्ष्कर, छावणी | |

या वर दाखविलेल्या मक्षिप्त शब्दाम ( ) ह्यात दिलेल्या श ब्दाशिवाय बहुतेक शब्दाम विभक्ति लावून उपयोग करावा लागतो तेथे तसा उपयोग करावा उ० अकदिरा (स० सस्थान) हि० हिदुस्थान राज० राजपुतान्यात अकरगाव (गा० गाव) हि० हिदुस्थानात मध्यप्रा० मध्यप्रातात नागपूर पर० नागपूर परगण्यात. पातोम (सरो० सरोवर) अमे० अमेरिका ग० खडात, द० दक्षिण, अमे० अमेरिकेत ब्राझील दे० ब्राझिल देशात. इत्यादि

# स्थलनामकोश.



**अकदिरा** (स) हि राज जोधपुर संस्थानापैकीं एक पोट स

**अकनर** (श) हि प इ चिनाव नदीचे काठी

**अकबरपूर** (श) हि वाय प्रा कानपुरापासून पश्चि २८ मैल

**अकबराबाद** (श) हि वाय प्रा रोहिलखंडात रामपुर स

**अकरगाव** (गा) हि मध्य प्रा नागपुर पर

**अकरमन** (श) यु य रशियात दिनिस्तर नदीचे मुखाजवळ

**अक्कलखोप** (गा) हि मु. इ सातारा जि तासगाव ता

**अकली** (श) हि राज जोधपुर स [काठा

**अकलूज** (श) हि मु इ सोलापुर जि माळशिरस ता. निरेच्या

**अकलोनी** (श) हि मध्य प्रा माळव्यात शिंद्याचे राज्यात.

**अकसम** (श) आफ्रि य मादागास्कर बेटाची प्राचीन राजधानी

**अकापलको** (ब) उ अमे ख मेक्सिको देशात पासिफिक महासा-

**अकारा** (न) अमे य द अमे ब्राझील देशात [गराचे काठी.

**अकारी** (श) अमे ख द अमे पेरू देशात

**अकाबा** (अखा) आशि ख तुर्कस्तानात सिनायजवळ

**अकांकागुवा** (पर्व) अमे य द अमे चिली व लाप्लाटा याचे मध्ये २ याच पर्वतापासून याच नावाची नदी निघते.

**अकियाव** (श) आशि ख ब्रह्मदेशात आराकान प्रा. कुलाडा नदीवर. येथे उत्तम तांदूळ होतात

**अकोट** (श) हिं वऱ्हाड प्रां अकोल्या जि येथे सतरंज्या चांगल्या होतात

**अकोरा** (श) हिं प इ पेशावर प्रां अटकेपा १२ मैलावर काबूल [नदीवर

**अकोला** (श) हिं वऱ्हाड प्रां मुख्य शहर

**अकोळनेर** (गा) हिं मु इ नगर जि दाभोळकराचे जाहागिरीचे गाव

**अक्कलकोट** (स श) हिं मु इ सोलापुराजवळ भोसले यानी १७०८ स्थापिले

**अक्कारम** (श) हिं म इ निजामचे हेद्राबादेपासून पू ५९ मैल

**अखुंडी** (श) हिं राज जोधपुर स लोणी नदीवर

**अखेरा** (श) हिं वाय प्रा फरुखाबाद जि फत्तेगडाहून २२ मैल

**अखोरा** (श) हिं काश्मीर स श्रीनगरच्या उत्तरेस २८ मैल

**अगाई** (श) हिं आद पा मुलतानपुरापासून ७० मैल

**अगापूर** (गा) हिं वाय प्रा रोहिलखंडात रामपूर स मुरादाबादेपासून १६ मैल [रेस ३१ मैल

**अगावळी** (गा) हिं मध्य प्रा माळव्यातील देवास स उज्जनीपा उत्त-

**अगस्ती** (न) हिं मु इ नाशिक जि येवले ता [होतात

**अगासी** (गा) हिं मु इ ठाणे जि येथे सुकेळा पुष्कळ व चांगली

**अगुजा** (भू) अमे य द अमे अगर्दी दक्षिणेकडील टोक.

**अगोवडा** (श) हिं मु इ गोवे प्रा समुद्रकिनाऱ्यावर

**अग्निपल्ली** (गा) हिं म इ निजामचे राज्यात

**अघई** (गा) हिं. मु इ ठाणे जि शहापूर ता

**अघलास** (भू) आफ्रि ख दक्षिण टोक

**अघुलास** (ब) अमे य द अमे कार्येजिनाच्या जवळ. येथून धान्य शिसे आणि रुपे परदेशात जाते

**अघेंडीग** (ठो) आशि स तुर्कस्तानात यान सरोवरा पा ४५मैल

**अजगड** (स श) ब्रि वाय प्रा बुंदेलखंडात [सापडतात

**अजमीर** (श) हिं राज येथे रंगीबेरंगी संगमरवरी दगड

**अजरबीजान** (प्रा) आशि स इराणात एक प्रांत

**अजिंठा** (डो) हिं वऱ्हाडचे द ह्यातून पैनगगा निघते यात कोरीव लेणी बौद्ध धर्माचा आहेत

**अजिमगड** (श) हिं ग्राय प्रा काशीपा उत्तरेस ८१ मैल येथे हस्तीदंती चुडे होतात

**अजिमतारा** (कि) हिं मु साताऱ्याजवळ साताऱ्याचे किल्ल्याचे नाव येथे शिवाजीचे वंशाचे राजाची गादीची जागा इ स १७००त स्थापिली व इ स १८४८त बुडाला

**अजीमाबाद** (श) हिं प इ सरहद्द प्रा कर्नालपासून ९ मैल.

**अज्रा** (श) हि मु इ कोल्हापूर स इंग्रजसरकारचे ताब्यात

**अझोप** (समु) यू स रशियाचे दक्षिणेस

**अटक** (श) हिं प इ काबूल नदी सिंधूस मिळते त्या ठिकाणी आहे येथे सिंधूस उतार आहे याच मार्गाने मुसलमान हिंदुस्थानात आले स्लेटीच्या दगडा च्या खाणी आहेत २ भावलपूरपा २८ मैल

**अटर** (श) हिं मध्यप्रा माळव्यात उज्जनीजवळ चवळा

**अटरनी** (श) ब्रि वाय प्रा आग्रा शहराजवळ [नदीवर

**अटलांटिक** (महासा) आफ्रि व यूरोप याच्या पश्चिमेस व अमेरिकेच्या पूर्वेस

**अटिना** (श) यु स इटाली देशात नेपल्सपा ११ मैल.

**अटांटो** (ग) अमे स द अमे न्यूग्रानाडा स

**अडगाव** (गा) हिं मु इ नाशिकशहरापा ५ मै २ मु इ खानदेश जि चोपडयाजवळ ३ वऱ्हाड प्रा अकोल्यापासून ३२ मैल येथे वेलस्लीसाहेबाने मराठ्याचा पराभव केला सन १८०३

**अडमिरल्टी** (बे) उ अमे युनैतेदस्तेतच्या पश्चिमेस पासिफिक महासागरात [प्रवरेस मिळते

**अडळा** (न) हिं मु इ नगर जि अकोले ता असून ती

**अडाण** (न) हिं वऱ्हाड प्रा वणी जिल्ह्यात वाईनगंगेस मिळते

**अडाना** (श) आशि ख तुर्कस्थानात

**अडूर** (न) यू फ्रान्स दे पिरिनिजपा निघून बिस्केच्या उपसागरास मिळते २ हिं मु इ. रत्नागिरी जि चिपळूणाजवळ

**अडूना** (श) आफ्रि अबिसीनिया प्रा गोदारचे ईशान्येस येथे अनेक प्रकारच्या व्यापाराची मोठी पेठ आहे.

**अडेगांव** (गा) हिं मध्य प्रा छिंदवाडा जि

**अडेल** (प्रा) आफ्रि दक्षिणेस अपूर्ण माहितीचा प्रदेश अबिसीनिया, केप ग्वार्डफुई याचे मध्ये असून यात सोने,हस्तीदंत,मेण,पुष्कळ सापडते [राजधानी.

**अडेलेड** (श) आस्ट्रेलिया बे इंग्लिशाचे ताब्यातील प्रदेशाची

**अड्डा** (न) यू स इताली देशात

**अड्रा** (ब) यू ख स्पेन देशात ग्रानाडा जवळ

**आड्रियानोपल** (श) यू ख तुर्कस्थानात रुमेलियाचे उत्तरेस

**अणकई टणकई** (डों) हिं. मु इ नाशिक जि येवले ता. असून त्यावर किल्ला बांधिलेला आहे

**अणस्कुरा** (गा) हिं मु इ रत्नागिरी जि. राजापूर ता
**अणसुरें** (गा) हिं मु इ. रत्ना जि राजापूर ता
**अता** (सरो) उत्त अमे राकीपर्वताजवळ कालिफोर्निया प्रातात
**अतिग्रे** (गा) हि मुं इ कोल्हापूर सस्थानात अतिग्र्याजवळ याच नावाचा तलाव.
**अतैया** (श) हि ब इ डाका शहराजवळ.
**अजनगर** (श) हि राज औद प्रातात
**अत्री** (न) हि भूतान स निघून ब्रम्हपुत्रेस मिळते
**अत्रोली** (श) हि राज अलिगड सस्थानात.
**अत्रोलीया** (श) हि वाय प्रा अजिमगडाजवळ
**अत्रौरी** (श) हि पजाब इ
**अथणी** (श) हि मु इ द महाराष्ट्रात बेळगाव जि तालुका.
**अथेलनी** (बे) यू य इग्लदच्या जवळ.
**अदल्या** (श) आशि ख तुर्कस्थानात
**अदाम्सपीक** (डो) हि द सिलोन बेटात या डोंगराचे शिखरावर बुद्धाची पावले उमटलेली आहेत असे म्हणतात.
**अधोई** (श) हिं मु इ कच्छ प्रा. मोठे व्यापाराचे ठिकाण
**अनगर** (गा) हि मु इ सोलापूर जि माढे ता [भिवडी ता
**अनगाव** (गा) हिं. म इ निजामाचे राज्यात २ मु इ ठाणे जि
**अनन** (श) यू ख स्काटलडात डफ्रिस प्रा याच नावाच्या [नदीवर
**अनलवाडा** (स श) हि राजपुतान्यात
**अनागोंदी** (श) हि म इ निजामाचे राज्यात सस्थान
**अनातोलिया** (प्रा) आशि ख तुर्कस्थानात भूमध्यसमु. काळा आशियामैनरमध्ये

**अनादीर** (अखा) आशि ख रशियात सैबिरिया प्रा. पूर्वेस पासि
महा २ याच नावाची नदी याब्लानाय पर्वतातून
निघून या अखातास मिळते [ममु काठा

**अनापा** (ब) आशि ख रशियादे ग्रान्सकाकेशियात काळ्या

**अनामल्ली** (डों) हि म. इ दक्षिण भागीं.

**अनावर** (स) हि राज यातून लुनी नदी निघते

**अनिवा** (भू) आशि ख पूर्वेस साघलीयन बेटाजवळ

**अनुप** (श) हि वाय प्रा गंगेच्या काठीं

**अनेर** (न) हि मु. इ खानदेश जि सिरपुर ता

**अन्ना** (श) आशि ख तुर्कस्तानात युफ्रातीस न चे काठीं

**अपर गोदावरी** (प्रा) हि मध्य प्रा या नावाच्या जि याचे मुख्य

**अपर नानीक** (श) उ अमे ग्रिन्लंदात [ठाणे सिरोंचा.

**अपरसिंदफ्रांटियर** (श) हिं सिंध प्रा उत्तर भागास म्हणतात

**अपलवाल** (श) यू इंग्लंदात वेस्टमोर्लंड प्रा इडेन नदीवर

**अपिनैन** (पर्व) यू ख इतालींत दक्षिणोत्तर

**अफगाणिस्थान** (दे) आशि रा या नावाचा देश हिंदु पश्चि

**अबरदीन** (श) यू ख स्कातलंदात येथे तागाचे वस्त्राचे कारखाने

**अबार** (श) हिं पूर्वेस. आसाम प्रा उत्तर हद्दीवर

**अबिसीनिया** (दे) आफ्रि ख. देश

**अबू** (पर्व) हिं राज अजमिराजवळ अरवली पर्वताचे शिखर.
येथे जैन लोकाचे देऊळ आहे उत्तम हवा

**अबो** (श) यू सं रशियात विद्येकरिता प्रसिद्ध

**अभोरा** (घा) हि मु इ नगर जि सगमनेरतालुक्याचे पूर्वेस.

**अमडापुर** (गा) हि वऱ्हाड प्रा बुलढाणा जि

**अमदपुर** (श) हिं वाय प्रा कानपूर जि काल्पीपा उत्तरेस १३ मैल

**अमदाबाद** (श) हि मु इ गुज प्रा येथ ढाली, रेशमी धोतरे व लुगडीं उत्तम होतात साबरमती नदीचे काठा

**अमनेर** (गा) हि वऱ्हाड प्रा उमरावती जि

**अमरकंटक** (पर्व) हि मध्य प्रा नर्मदेच्या उगमाजवळ | नेपाळ स

**अमरपुर** (श) हिं च्या पूर्वेस ब्रम्हदेशात इरावतीचे काठीं २म इ.

**अमरवाडा** (गा) हिं मध्य प्रा. छिंदवाडा जि |ताल्लारी प्रा.

**अमरापुर** (गा) हि मु इ नगर जि शेवगाव ता. २ मद्रास इ

**अमरावती** (न) हि म इ कावेरी नदीस मिळते

**अमरोली** (श) हि मु इ गुजराथ प्रा गायकवाड ग

**अमलुक** (ब) यू स गेरिश समु आगल्सी बेटात

**अमळनेर** (श) हिं मु इ खानदेश जि ता येथे सखाराम बोवा म्हणून प्र साधु होऊन गेले

**अमुदारीया** (न) आशि स स्वतंत्रतार्त आरल सरोवरास मिळते.

**अमू** (न) आशि ख तार्तरात १३०० मेल लांब

**अमूर** (न) आशि. ख. मंगोलिया प्रा अल्ताई प निघून तातारचे आखा मिळते

**अमृतसर** (श) हिं प इ जि हे शीक लोकाचे पवित्रस्थान. येथे शाली, सुती बनाती व हस्तीदंती चुडे चांगले होतात भांड्यावर नकशी काम करितात

**अमेरिका** (ख) पृथ्वीवर चार खंडे आहेत त्यापैकी हे इ सन १४९७ कोलंबसाने शोधिले ह्याचे द व उ. अमे. असे दोन भाग आहेत यात राकेल, राळ व साखर पुष्कळ होते.

**अमोद** (श) हिं मु इ गुजराथ प्रा भडोच जि. ता.
**अमोल** (श) आशि ख इराण देशात
**अयर्लंद** (बे) यू ख ग्रेटब्रिटन बेटाचे पश्चिमेस ६० मैल
**अयरीश** (समु) यू ख अयर्लं बे. पूर्वेस व इग्लदचे पश्चि
**अयुथिया** (श) आशि ख पूर्वेकडील द्वीप मिनाम नदीचे काठी
**अयोध्या** (श) हि वाय प्रा पूर्वेस फार प्रा काळाचे श शरयू नदीवर येथे श्रीरामचद्राचा जन्म झाला
**अरगांव** (गा) हि वऱ्हाड प्रा एलिचपूरच्या पश्चिमेस
**अरगून** (न) आशि ख माचुरियात निघून आर्मा न मिळते
**अरण** (गा. स) हि मु इ सोलापूर जि मोडनिब ता मिरजकराचे
**अरणी** (गा) हिं मु इ खानदेश जि तळोदे ता.
**अरबस्तान** (दे) आशि ख देश हिंदुस्तानचे पश्चिमेस
**अरबी** (समु) आशि ख अरबस्तान व हिंदुस्थान याच्यामध्ये
**अरमागांव** (श ब) हि म इ नेलोर प्रा येथे ईस्ट इंदिया कपनीने इ स १६२६ त वसाहत केली मद्रास पा ६६मै
**अरल** (सरो) आशि, ख तार्तरी दे हे २७० मैल लाब व १३० मैल रुद आहे
**अरलनोर** (सरो) आशि ख चिनईतार्तरीमध्ये
**अरवली** (पर्व) हि राजपुतान्यात ३०० मैल लाबीचा आहे याचे शिखर अबू हे समु पा ५००० फूट उच आहे
**अरबील** (श) आशि ख तुर्कस्थानात मोसलच्या दक्षि ४० मैल
**अराकान** (प्रा श) हि ब. इ पूर्वेस कुलोदन न काठी
**अरारात** (पर्व) आशि ख तुर्कस्तान व इराण याच्या हद्दीवर.

**अरास** (न) आशि तुर्कस्तानात अर्जरूम जवळून नि कुरीस न मिळते हिला आक्सिस हे नाव आहे

**अरंग** (श) हि मध्य प्रा रायपूर जि येथे पितळेचीं भाडीं चागलीं होतात [बाधिला आहे

**अरंगकुरंग** (डो) हि मु इ नाशिक जि इगतपुरी ता यावर किल्ला

**अर्कतस्क** (श) आशि ख पूर्व सैबिरियाची राजधानी

**अर्काट** (प्रा श) हि म इ कर्नाटक प्रा पालर नदीवर या प्रातात कापसाचा मोठा व्यापार चालतो

**अर्किपेलागो** (समु) यू ख ग्रीस व आशियातील तुर्कस्तान याचे मध्ये.

**अर्जरूम** (श) आशि ख तुर्कस्तान पैकी आर्मानिया प्रा

**अर्जीस** (पर्व) आशि ख तुर्कस्तानात

**अर्तीक** (महासा) यू ख व आशि ख याचे उत्तरेस

**अर्व** (सरो) यू ख अयर्लंदमध्ये

**अलकनंदा** (न) हि वाय प्रा हरिद्वारा पुढे गगेस मिळते

**अलकुटी** (गा) हि मु इ नगर जि पारनेर ता

**अलगोवा** (अखा) आफ्रि ख दक्षिणेस

**अलजीयर्स** (श) आफ्रि ख च्या उत्त बार्बरी स फ्रेचाचे

**अलजेरीया** (स) आफ्रि ख च्या उत्तरेस बार्बरी स फ्रेचाचे

**अलताई** (पर्व) आशि ख राशियात सैबिरियाचे दक्षिणेस पूर्वपश्चिम

**अलपई (ल्ल)** (ब) हि म इ त्रावणकोर स येथे इ स १८०९ बड झाले होते

**अलप** (श) यू ख जर्मनींत वर्तमबर्गात दान्यूब न चे काठीं.

**अलमोदा** (श) हिं वाय प्रा कमाऊन जि मुख्य श.

**अलवका** (मैदा) आशि. ख. तुर्कस्तानात लेबानन पर्वतावर

**अलवड** (स श) हिं राज जयपुरच्या उत्तरेस
**अलवेगान** (न) यू ख इतालीत सार्डिनियाचे राज्यात
**अलवाल** (र श) हिं प इ सतलज न लढाई इ व शीक १८४६
दुधासारखा पांढरा संगमरवरी दगड सापडतो
**अलसतर** (प्रा) यू ख अयर्लंदात
**अलसवातर** (सरो) यू ख इंग्लंदात [निघून लेना न मिळते
**अलदान** (न) आशि ख रुसदेशात सैबिरियात याब्लानाय पर्व
**अलपादन** (प्रा) यू ख स्पेनदेशात
**अलाहाबाद** (श कि) हिं वाय प्रा नि गंगा व यमुना याचे संग॰
मावर यास प्रयाग म्हणतात
**अलिकाठा** (ब) यू ख इतालीच्या दक्षिणेस सिसिली बे
**अलिगड** (श कि) हिं वाय प्रा जि आग्र्याचे उत्तरेस ५५ मैल
**अलिपुर** (श) हिं ब इ कलकत्त्यापासून ६ मैल येथे ले गवर्नर
**अलिबाग** (श) हिं मु इ कुलावा जिल्ह्याचे मुख्य श [राहतात
**अलिमर्दानखान** (काल) हिं प इ कर्नाल पा यमुनेचा का-
लवा १२० मैल लांब काढून दिल्लीजवळ यमुनेस
**अलिराजपुर** (स) हिं मध्य प्रा माळव्यात [मिळविला आहे
**अलिवारताडा** (श) हिं मु इ सिंध प्रा हैद्राबाद जि ता
**अलेक्झांड्रिया** (श ब) यू ख दक्षिणेस भू समु सार्डिनिया बेटात
२ आफ्रिका ख इजिप्त दे हे मोठ्या शिकं-
**अलेक्झांड्र** (श) यू ख रशियात [दराने वसविले
**अलेपी** (श ब) हिं म इ त्रावणकोर स येथे इमारतीचें
लांकड, सुपारी, नारळ, मिरीं, वेलदोडे,
याचा व्यापार चालतो

**अल्यूशियन**(बे) आशि ख रसदेशात सबिरियाचे पू ास पासिफि कमहासागरात

**अवंती** (प्रा) हि मध्यहि माळवा प्रा चे पूर्वीचे नाव असून उज्जनीस म्हणतात

**अशिरगड** (कि) हि मध्यप्रा खाडवा जि बऱ्हाणपुराजवळ हा किल्ला खानदेश जि ताब्यात उ फ्र १३००

**अशेरियन** (प्रा) आशि ख तुर्कस्तानात याची राजधानी निनवी

**अष्टमी** (गा) हि मु इ कुलाबा जि रोहे ता

**अष्टी** (श) हिं मु इ सोलापूर जि येथे म १८१८ त पे श व स्मिथ याची लढाई यात बापू गोखले मारले गले

**अष्टे** (श) हि मु इ सातारा जि वाळवे ता, २ निजामाचे राज्यात, ३ भोपाळप्रा किल्ला ४ कुला जि पनवेल ता

**असई** (गा) हि निजामचे राज्यात औरंगा पा २२ कोस लढाई १८०३ इ व मराठे

**असखेडे** (गा) हि मु इ नाशिक जि बागलाण ता

**असनशियन**(श) द अमे पाराग्वे देशाची राजधानी

**असुवा** (न) आफ्रि ख वारिगा सरो मिळते

**असुवान** (श) आफ्रि ख नैल न चे काठीं

**असेनशन** • (बे) द आफ्रि पश्चिमेस अतलानिक महासागरात

**असोदे** (गा) हि मु इ खानदेश जि जळगाव तालुक्यात

**असंडोली** (न) हि मु इ कोल्हापूर स भोगावती न मिळते

**अस्क** (न) यू ख इंग्लदात इ मन्मथ प्रातात

**अस्तुरीयन** (पर्व) यू ख स्पेन व पोर्तुगाल याचेमध्य

**अस्त्राबाद** (श ब) आशि ख कास्पियन समु (सरो) काठी

**अस्त्रिया** (दे) यू ख प्रसिया दे दक्षिणेस
**अर्स्वा** (गा) हि मु इ नगर जि सगमनेर ता
**अहमदनगर** (श) हि मु इ प्रसिद्ध श येथ किल्ला आहे मुसल मानी बादशहाचे राज श होते
**अहिरें** (गा) हि मु इ पुणे जि [बरीच आहे
**अळतें** (श) हिं मु इ कोल्हापूर स येथे जैन लोकाची वस्ती
**अंकलेश्वर** (श) हिं मु इ गुजराथेत भरूच जि
**अंकुसा** (गा) हिं मध्य प्रा सिरोच्या जि
**अंकोबार** (श) आफ्रि ख आबिसीनिया देशात
**अंग** (दे) हि ब इ गया प्राताचे पूर्वीचे नाव
**अंगारा** (न) आशि बैकल सरो निघून येनिसी नदीला मिळते
**अंगोरा** (श) आशि स तुर्कस्थानात आशिया मैनरमध्ये आहे येथे लोकर उत्तम होते
**अंगोला** (प्रा) द आफ्रि कागो पर्वताजवळ [८ कोसावर
**अंजनगावसुर्जी** (गा) हिं वऱ्हाड प्रा एलिचपुरापासून पश्चिमेस
**अंजनवेल.** (गा) हि मु इ रत्नागिरि जि चिपळूण ता २ या नावाची खाडी दापोली ता
**अंजनी** (न) हिं मु इ खानदेश जि येरडोल ता [चागली आहे
**अंजनेरी** (डो) हिं मु इ नाशिक जि नाशिका जवळ येथे हवा
**अंजर** (श) हि मु इ कच्छ प्रातात
**अंजूर** (गा) हि मु इ ठाणे जि भिवडी ता [नाव
**अंतरवेदी.** (प्रा) हि गगा व यमुना ह्या दोन नद्यामधील प्रदेशाचे
**अंतापूर** (गा) हि मु इ नाशिक जि बागलाण ता
**अंतुरली** (गा) हि मु इ खानदेश जि भुसावळ ता तापीचे काठीं.

**अंदरसुल** (गा) हि मु इ नाशिक जि येवले ता विड्याची पाने [चांगलीं होतात
**अंदालुशिया**(प्रा) यू स स्पेन देशात
**अंदमान** (बे) आशि स द हिंदीमहासागरात काळ्या पाण्याचे कैदी येथे ठेवितात
**अंचळगांव** (गा) हि मु इ सोलापूर जि सांगोले ता
**अंबरनाथ** (गा) हि मु इ ठाणे जि कल्याण पा २ कोसावर येथे फार जुने जैन लोकांचे देऊळ आहे
**अंबवला** (घा) हि मु इ पुणे जि येड्याजवळ [ल छावणी
**अंबाला** (श) हि प इ जिल्हा सतलज व यमुना ह्यांचे मध्ये
**अंबिका** (न) हि मु इ गुजराथ प्रा सुरत एजन्सीतील वासदा स [१७४९ इ व फ्रेंच
**अंबूर** (गा) हि म इ बंगलोरच्या पूर्वेस ८० मैल ल
**अंबोयना** (बे) आशि स आग्नेयीस पासिफिक महासागरात
**आ** (सरो) यू ख स्कातलंदात
**आअलबर्ग**(स श) यू स जर्मनीत स
**आकबा.** (व) आशि ख आरबस्तानात तांबड्या समु चे काठी
**आकसस** (न) आशि स तार्तरी देशात
**आक्स्फोर्ड** (श) यू ख इंग्लंद दे विद्यालयाकरिता प्रसिद्ध
**आकियाब** (श) हि ब इ पूर्वेस आराकान पर
**आगबाई** (न) आफ्रि ख अत्लांतिक महासागरास मिळते
**आगुबा** (ज्वा प) अमे ख मेक्सिको देशात
**आग्रा** (श कि) हिं वाय प्रा यमुना न चे काठीं किल्ला अकबराने बांधिला व ताजमहाल इमारत शहाजहान बादशहाने बांधिली लाकडावर वेल, चित्रे खोदण्याचे काम उत्तम

**आग्लेशिया** (प्रा) य स इंग्लंदान [नावाची खाडी

**आचरे** (गा) हिं मु इ रत्नागिरी जि माळवण ता व याच

**आचीन** (भू) आशि ख दक्षिणेस सुमात्रा बेटाचे वायव्येस

**आच्छालिया**(डो) हिं मु इ गुज प्रा गायकवाड स सरेटा ता

**आजरे** (गा) हिं मु इ कोल्हापूर स हिरण्यकेशी व चित्री या नद्याचे सगमावर ता

**आटगाव** (गा) हिं मु इ ठाणे जि शाहापूर ता

**आडावद** (गा) हिं मु इ खानदेश जि चोपडे ता येथे उष्ण पाण्याचे झरे आहेत

**आडिवरे** (गा) हिं मु इ रत्नागिरी जि राजापूर ता

**आडे** (गा) हिं मु इ रत्नागिरी जि दापोली ता

**आण्या** (डो गा) हिं मु इ पुणे जि जुन्नर ता चे उत्तरेस असून या नावाचा घाटही आहे

**आतारान** (न) हिं पूर्वेस ब्रम्हदेशात तेनासरीम प्रा

**आतीत** (गा) हिं मु इ सातारा जि कऱ्हाड ता

**आथाबास्का**(सरो) अमे स उ अमे ब्रिटिश अमेरिकेत

**आथेन्स** (श) यू स ग्रीस देशाची राज एजियन समुद्रावर

**आदन** (ब) आशि स आरबस्तानचे दक्षिणेस इंग्लिशाचे ताब्यात

**आदामचा पूल**(पूल) हिं व सिलोन याच्या मध्ये जो पुलासारखा भाग आहे त्यास हिंदुलोक रामाचा सेतु [असे म्हणतात

**आदावा** (श) आफ्र ख अबिसीनियात

**आदेलेद** (बे श) द आस्ट्रेलियात इंग्लिशाचे रा श, द अमे दक्षिणेस मागेलनी सामुद्रधुनीचे मुखात बेट

**आद्रिआतीक** (समु) यू ख इताली व तुर्कस्तान याचेमध्ये
**आनाबोन** (बे) आफ्रि ख गिनीच्या आखातात
**आनामल्ली** (डो) आशि ख मद्रास इ कोइमतूर प्रा
**आनंद** (गा) हिं मु इ गुजराथ प्रा खेडा जि ता
**आपटे** (गा) हिं मु इ कुलाबा जि पनवेल ता
**आफीर** (पर्व) आशि ख ट सुमात्रा बेटात
**आफ्रिका** (ख) पृथ्वीत जी खंडे आहेत त्यात हे तिसरें खंड
**आबाजबीज**(पर्व) आफ्रि ख अबिसीनियात
**आबु** (ब) आशि ख इराणचे आखातावर
**आबुमन** (श) आशि ख चीन दे द मकाव बेटात
**आबोमे** (श) आफ्रि ख गिनीची प्राचीन राजधानी [कांठीं
**आभोणें** (गा) हिं मु इ नाशिक जि कळवण ता गिरणेच्या
**आमझेरा** (स) हिं मध्यहिंदुस्तानात माळव्यात
**आमणें** (गा) हिं मु इ ठाणे जि भिवंडी ता.
**आमनेर** (गा) हिं मध्यप्रा, तापीचे काठीं
**आमलीआरा**(स) हिं मु इ गुजराथ प्रा महिकाठा एजन्सीमध्ये.
**आमस्तरदाम.**(श) यू ख हालंद दे राज आमस्तेल न काठीं
हे खांबावर बांधले आहे
**आमाझोन** (न) द अमे ब्राझील दे असून अत् महा मिळते.
मुखाजवळ या नावाची खाडी ३९०० मै. ला.
**आमाय** (बे. श) आशि ख चीनच्या आग्नेईस
**आमोय** (ब) आशि ख चिनात [आहे.
**आयोनियन**(बे) यू ख ग्रीसचे प. व तेथेच या नावाचा समुद्र

**आरक्यान्सास** (न.) उ अमे स्वतंत्र स मिसिसिपी न मिळते.
**आरग** (गा ) हिं मु इ कोल्हापूर स आजरे ता
**आरजेन्तैन कानफिदरेशन** (दे ) अमे स द अमे देश
**आरण** (न ) हिं वऱ्हाड प्रा अजिंठ्याचे डोंगरातून निघून
**आरन** (बे ) यु स आयर्लंदजवळ | पैनगंगा न मिळते
**आरपाडी** (गा ) हिं मु इ सातारा जि
**आरबैल** (गा ) हि मु इ द महाराष्ट्रात
**आरमोरी** (श ) हिं मध्य प्रा चांदा जि वाईनगंगेवर, येथे लोखंडाचा व्यापार मोठा चालतो
**आरवली** (न ) हिं म इ म्हैसूर स निघून कावेरीस मिळते.
**आरळे** (गा ) हिं मु इ सातारा जि शिराळे पेट्यात
**आरागुआय** (न ) द अमे रिओग्यारा सांडीस मिळते
**आरांतेस** (पर्व ) आशि ख इराणात
**आरिका** (ब ) द अमे पेरू दे व्यापाराचे मोठे बंदर
**आरिझाना** (ज्वा प ) अमेरि ख मेक्सिको देशात.
**आरुणावती** (न ) हिं वऱ्हाड प्रा वणी जि. अजिंठा पर्व पासून निघून पैनगंगेस मिळते
**आरें** (गा ) हिं मु इ रत्नागिरी जि चिपळूण ता
**आरेंज** (न ) द आफ्रि केप कालर्नीत १०० मैं ला
**आरेंजरिवरफ्रिस्तेत** (प्रा ) आफ्रि ख केपकालनींत आरेंज न चे
**आर्कनी** (बे ) यू ख स्कातलंदचे उ [कांठीं
**आर्कानसास** (न ) अमे मिसिसिपी नदीला पश्चिम अंगाने मिळते.
**आर्केंजल** (श ) यू ख रशियात द्वीना न. मुखाजवळ
**आर्गेन** (श ) दक्षि. अमे ब्राझील देशात

**आर्झेब्रीज** (पर्व) यू ग जर्मनी देशात साक्सनी व बोहिमिया याच्या मध्ये येथे खनिज पदार्थ सापडतात
**आर्गीन** (बे) आफ्रि ख साहाराचे किनाऱ्यावर
**अर्टरलस्पिट्झ** (पर्व) यू ख आस्त्रिया दे समुद्रापा० उची
**आर्ता** (अखा) यू ख ग्रीसच्या वायव्येस [१२७८९ फूट
**आर्तिक** (महसा) आशि ख उत्तरेस उत्तर ध्रुवाभोवती
**आर्नाळा** (गा) हिं मु इ ठाणे जि वसई ता
**आर्नो** (न) यू ख इतालींतून निघून भूमध्य समु मिळते
**आर्मझ** (बे) आशि ख इराणचे पूर्वम इराणचे अखातात
**आर्मिनिया** (प्रा) आशि ख तुर्कस्तानात [सामु व बेट
**आर्न** (न) यू ख. स्विटसर्लंदातून निघून ऱ्होन नदीला मिळते
**आर्नि** (गा) हिं मु इ सातारा जि २ खानदेश जि
**आलओबेईद** (श) आफ्रि. ख न्यूबिया देशात [धुळे ता
**आलतोना** (श) यू ख देनमार्कांत ह्लैसन प्रा.
**आलबरो** (श) यू ख इग्लदात
**आलजेशिरा** (प्रा) आशि ख तुर्कस्तानात
**आलदरने** (बे) यू ख इग्लिश खाडींत
**आलदरली** (श) यू ख इग्लदात ग्लास्तरशायर प्रांतात
**आलद्राबा** (बे) आफ्रि पूर्व किनाऱ्यावर हिंदीमहासागरात.
**आलपेन** ˙ (पर्व) उ अमे स्वतंत्र स
**आलबर्त** (न) आस्त्रेलियात असून पासि महा मिळते
**आलबर्तनाएंजा** (सरो) आफ्रि ख मध्यभागीं
**आलबनी** (श) उ अमे यूनैतेदस्तेद मध्ये न्यूयार्क प्रा [काम होतें
**आलवार** (स) हिं राजपु जयपुरच्या उत्तरेस येथे कुफ्तगारीचे
**आलसेंत्सबे** (उपसा) द. अमे ब्राझील देशात.

**आल्प्स** (पर्व) आस्ट्रेलियात २ यू ख स्वित्सर्लंदमध्ये

**आल्मा** (श) यू ख स्पेन देशात [निघून उत्तरमहासा मिळते

**आलानेक** (न) आशि ख देशात सैबिरियातून अलताई पर्वतापा०

**आलावा** (प्रा) यू ख तुर्कस्थानात

**आलास्का** (भू) अमे ख उत्तर अमे वायव्येस.

**आलाड** (बे) यू ख स्वीदनचे पृ बालतिक समु

**आलियास्का** (द्वी क) अमे ख वायव्य कोपऱ्यास

**आलिकाती** (श) यू ख स्पेनदेशात

**आलीगेतर** (न) आस्त्रालियात पामि. महा मिळते

**आलींपस** (पर्व) यू ख तुर्कस्तानात

**आलुश** (बे) उ अमे युनतेदस्तेत्सचे अमे दक्षिणेस

**आलेकजांद्रिया** (सरो) आस्त्रेलियात गोड्या पाण्याचे

**आलेघानी** (पर्व) उ अमे युनैतेदस्तेदमध्ये यात कोळसे, तांबे, शिसे याच्या खाणा आहेत

**आलेपो** (श) आशि ख तुर्कस्तानची प्राचीन रा येथे १८२२ [मोठा धरणीकंप झाला

**आलेबाग** (प्रा) उ अमे स्वतंत्र स

**आलेवाडी** (गा) हिं मु इ ठाणे जि माहिम ता

**आलौता** (न) यू ख तुर्कस्तानातून निघून दान्यूब न मिळते

**आवरण** (पर्व) यूरो. ख फ्रान्सात आग्नेयी दिशेस.

**आवसरी** (गा) हिं मु इ पुणे जि खेड ता

**आवळस** (गा) हिं मु इ पुणे जि हवेली ता मुळशी पेट्यात

**आवा** (श) आशि ख ब्रह्मदेशात इरावतीचे काठी

**आवाकान्स** (श) आशि ख रशिया देशात सैबिरियात

**आव्हाणें** (गा) हिं मु. इ खानदेश जि. जळगाव ता.

आविडो (श) य् ख इताल्यात कालाब्रिया प्रा
आशाती (स) आफ्रि ख मध्य आफ्रिकेत सिद्दी लोकाचे
आशिया (ख) पृथ्वीवर जे चार खडे आहेत त्यापैकीं पहिले.
आशियामैनर (प्रा) आशि ख तुर्कस्तानात
आशिये (गा) हिं मु इ रत्नागिरी जि देवगड ता.
आमलगाव (गा) हिं वऱ्हाड प्रा आकोला जि
आष्टा (गा) हिं मध्य प्रा शिवनी जि
आष्टी (गा) हिं मु इ सोलापूर जि माढे ता.
आसवली (गा) हिं मु इ सातार जि खडाळे पेट्यात २ नाशि-
आसाम (प्रा) आशि ख हिं पूर्वेस [क जि इगतपुरी ता
आस्त्राखान (श) यू ख रशिया दे ओलगानदीचे काठी
आस्त्राल (बे) आशि ख द पासि महासा पोलिनिशिया वेटसमूहात
आस्त्रालियनबाईत (अखा) आशि ख द पासि सा आस्त्रालिया बे
आस्त्रालिया (बे) आशि ख द पासि महासा सर्वात मोठे बेट. ह्यात सोने व तावे सापडते [बेटाचे भाग.
आस्त्रालेशिया (बे) आशि ख द पासि महासा ओशियानिया
आस्त्रलियनआलप्स (पर्व) आशि ख द आस्त्रेलिया बेटात
आसू . (गा) हिं मु इ सातारा जि फलटण स
आहुमे (गा) हिं मु इ पुणे जि घोड न उगमाजवळ.
आळदी (गा) हिं मु इ पुणे जि खेड ता येथे ज्ञानोबाची समाधी आहे आषाढी व कार्तिकी या एकादशीस
आंगलसी (बे) यू ख ऐरिस समुद्रात [मोठी यात्रा भरते.
आजरलें (गा) हिं. मु इ रत्नागिरी जि दापोली ता.

**आतवर्प** (श) यू ख बेलजिअम दे स्केल्त नदीचे काठीं
**आतारीओ** (सरो) उ अमे कानडा व युनेतेदस्तेत यामध्ये
**आतार्तीक** (समु) दक्षि ध्रुवा भोवताली [न्सच्या मुखाजवळ
**आंतिकोस्ती** (बे) उ अमे ख कानडा प्रांताच्या पश्चि सेन्तलारे-
**आंतीबारी** (श) यू ख मार्तिनिग्रोंत आद्रिआतीक समु काठा
**आतीतारस** (पर्व) आशि ख तुर्कस्तानात आशियामैनरात दक्षिण
**आंतीयाक** (श) आशि ख तुर्कस्तानात [अगास.
**आंतीसाना** (ज्वा प) द अमे इक्वेदोर देशात
**आदीज** (पर्व) द अमेरिकेत उतर दक्षिण आहे. पृथ्वांत सर्व
पर्वतामध्ये लांब आहे
**आंध्र** (दे) हि म इ ह्यास तैलगण म्हणतात
**आधळगांव** (गा) हि मध्य प्रा येथे लुगडीं चागली होतात
**आंधेरी** (गा) हि मु इ ठाणे जि साष्टी बेटात
**आंबेघांट** (घा) हि मु इ कोल्हापुराहून रत्नागिरीच्या रस्त्यावर
**आंबुळगड** (कि) हि मु इ रत्नागिरी जि. राजापूर ता
**आंबे** (गा) हि मु इ दिंडोरी ता बाणगंगेच्या काठीं
**आंबेगाव** (गा) हि मु इ. पुणे जि मावळ ता व. २ खेड ता.
**आंबोली** (गा) हि मु इ रत्नागिरी जि मावळ ता व याच
**आंब्रोज** (बे) द अमे चिलीच्या पश्चिमेस [नावाचा घाट

## इ

**इकमुल** (श) यू ख जर्मनीमध्ये ववेरिया स येथे नेपोलियन
बोनापार्टीने इ स १८०९ त आस्त्रियन
लोकांवर जय मिळविला
**इकर्नफोर्द** (ब) यू ख देन्मार्क देशात.

**इकाटेल** (श) हि बं इ. कलकत्त्याजवळ मिदनापूर प्रा.
**इकेरी** (गा) हिं वाय प्रां आलिगड जि.
**इकौना** (श) हि.वाय प्रा गाझीपूर जि
**इक्कू** (श) यू ख बेलजममध्ये फ्लांडर्स प्रा
**इक्मिआझीव** (श) आशि ख. तुर्कस्तानात आर्मीनिया प्रा.
**इक्केदोर** (दे) द अमे याची रा. क्विटो
**इखागांव** (गा) हि. राज जोधपुर स
**इखाबो** (बे) आफ्रि. ख अटलांटिक महासागरात. येथून प्रथम माशाचे खत इग्लंदांत नेत असत
**इगतपुरी** (श) हि मु इ नाशिक जि ता
**इगलस्टाट** (श) यू ख जर्मनीत बवेरियामध्ये.
**इगोरो** (स) यू ख स्वित्सर्लंदमध्ये.
**इग्गा(एग्गा)** (श) आफ्रि ख नैजर नदीवर
**इग्ला** (न) यू खं आस्त्रियामधील मोरेविया प्रांतात [नदीवर.
**इग्लाव** (श) यू ख आस्त्रियामधील मोरेविया प्रांतात इग्ला-
**इग्लो.** (श) यू ख आस्त्रिया देशांत हगेरीत येथे तांबे व लोखंड यांच्या खाणी आहेत
**इचलकरंजी** (श) हि मु इ. द महाराष्ट्रात कोल्हापूर संस्थानांत. स.
**इचावर** (श) हि माळवा प्रांतांत भोपाळ सं.
**इचीन** (न.) यू ख. इग्लंदांत हंटस प्रांतांत
**इच्छागर** (श) हिं. ब इ कलकत्त्याजवळ.
**इच्छापूर** (गां) हिं. मध्य प्रां. नेमाड. जि
**इजनाजर** (श) यू ख स्पेनात कोर्डोवा प्रांतांत.
**इजिप्त.** (दे.) आफ्रिका खंडांत.

**इजियन** (अखा) आशि य रूस देशात सैबिरीयाचे पूर्वेस
**इजेना** (अखा) यु ख ग्रीस देशात मोरिया व अथेन्स याचे मध्ये
**इटावा** (श) हि वाय प्रा यमुनेच्या काठा जि
**इटौली** (श) हि वाय प्रा शहाजहानपूर जि
**इडन** (न) यू ख वेस्टमोर्लंड प्रातात
**इडा** (पर्व) यू ख तुर्कस्तानात क्रिस बेटांत २ आशि ख तुर्कस्थानात आशियामैनर प्रातात
**इतगांव** (गा) हि वाय प्रा बरेली जि
**इतन** (श) यू ख इग्लदात विद्यालयाचे शहर
**इतमदपूर** (श) हिं वाय प्रा आग्रा जि
**इतापल्ली** (गा) हि म इ कोईमतूर प्रातात
**इताली** (दे) यू ख दक्षिणेकडील देश
**इतुडा** (श) हि नेपाळ स
**इत्वापुर** (गा) हिं वाय प्रा बरेली जि
**इथीका** (बे) यू ख भूमध्य समुद्रात अयोनियन बेटात
**इदलाबाद** (श) हि म इ निजामचे राज्यात
**इदुमिया** (पर्व) आशि ख अरबस्तानात सिनाय पर्वताजवळ
**इद्दा** (श) आफ्रि ख. नैजर नदीच्या काठीं
**इद्रिया** (प्रा) यू ख आस्त्रियात
**इद्रुपा** (न) हि वऱ्हाडात अकोला जि. असून ती पूर्णा नदीस [मिळते.
**इनवरनेस** (प्रा) यू ख स्कातलदांत
**इनशान** (पर्व) आशि ख चीनचे रा मंगोलिया प्रा मानच्यु [रियांत गेला आहे
**इनाकोंडा** (गा) हि म. इ गतूर प्रातात येथे हमेशा धरणी-
**इनामगाव** (श) हि अयोध्या प्रातात [कंप होतात.

इन्न (न) यू ख आफ्रियात
इन्नोर (श) हि म इ चिंगलपट जि
इन्सब्रुक (श) यू ख आस्ट्रियात तिरोल प्रातात
इन्हवेन (श) यू ख रशियात क्रिमिया द्वीप सेबास्तपुलाजवळ २ सफाक प्रा ओरवेल नदीच्या काठीं.
इन्हौना (गा) हि वाय प्रा औद जि
इपानोमेरिआ (गा) यू ख ग्रीस जवळ सतोरीन बेटात
इप्सिच (श) यू ख इंग्लदात
इबी (श) यू ख स्पेन देशात वालेनशिया प्रातात
इब्रामपला (श) हि म इ निजामहैदराबादेजवळ
इब्राहिमपूर (श) हिं वाय प्रा गाझीपूर जि
इब्रेला (श) यू ख रोमेनियात गालात्स पा १० मैलावर दान्युब नदीचे काठी असून येथे गहू, लोकर, मीठ वगैरे जिनसाचा मोठा व्यापार चालतो व गलबते बाधण्याची जागा आहे.
इमजंग (श) हि पूर्वेस आसाम प्रातात सुदिआ पर
इमरतपूर (श) हि वाय प्रा फरकाबाद जि इसलामगज परगण्याची मुख्य जागा येथे नीळ पिकविण्याचा कारखाना आहे
इमलाक (श) हि वाय प्रा औद जि सुलतानपुरापासून १५मैल.
इमामगड (गा) हि मु इ हैदराबादच्या ईशान्येस ९० मैल. लढाई स १८४३ इ व अमीर
इमामपूर(धा गा) हि मु इ नगर जि नगराहून नेवाश्यास जाण्याचे वाटेवर

**इराक** (न) हि मु इ सिंधप्रांतात नदी

**इराकअरबी** (प्रा) आशि ख तुर्कस्तानात

**इराकोलाम**(श) हिं म इ दक्षिणेस कोचीन स

**इराण** (पारसीक) (दे) आशि ख देश यात मोती, रत्ने, कच्चे रेशीम व घोडे होतात २ या नावाचे अखात

**इरावती** (न) आशि ख ब्रम्हदेशात हिमालयातून निघून मार्ता बानचे अखातास मिळते ला १२०० मेल

**इरी** (सरो) अमे ख उ अमे ब्रितिश अमे

**इरेज** (श) हि बुंदेलखडात जलून प्रांतात वटवा नदीवर

**इर्कुतस्क** (श) आशि ख पूर्वसैबिरियाचे मु श अगारा नदीवर

**इर्तिश** (न) आशि ख रुसदेशात सैबिरियात ओबी नदीस [मिळते

**इर्दतनगर** (गा) हिं वाय प्रा आम्र्या जवळ

**इलकल्ल** (श) हिं मु इ विजापूर जि

**इलचेस्तर** (श) यू ख इग्लदात समरसेट प्रांतात

**इलपूर** (श) हि म इ मथुरा प्रांतात

**इलमिन्स्तर**(श) यू ख इग्लदात समरसेट प्रांतात

**इलमेन** (सरो) यू ख रशियात [मिळते

**इला** (न) यू ख फ्रान्सात -हैन नदीस स्टेसबर्ग श जवळ

**इलामान** (पर्व) उ. अमे युनेतेदस्तेत्समध्ये

**इलाय** (श) यू ख इग्लदात केंब्रिज प्रांतात ऊझ नदीवर.

**इलांद** (बे.) यू ख. बालतिक समुद्रात.

**इलिचपूर** (श) हि वऱ्हाड प्रा जि

**इलिजाबेथ** (ग) द अफ्रिकेत केपकालनींत

**इलिमानी** (पर्व) द अमे बोलिव्हिया देशात

**इलिया** (पर्व) आशि ख हि दक्षिणेस सिलोन बेटात

**इलिरिया** (श) यू ख आस्त्रियात येथे डोंगरात सर्व प्रकारच्या धातु सापडतात त्यात पारा अतिशय सापडतो, मका, गहू आलिव्हवृक्ष हे उत्पन्न होतात रेशीम, कापूस, काच व लोखंडी तारा ह्याचा व्यापार चालतो

**इल्केस्टन** (श) यू ख इंग्लंडात डर्बी प्रांतात येथे रेशीम, पाय-मोजे व सास चांगले होतात

**इलिफ्रोन्सो**(श) यू ख स्पेन देशात हे पर्वतावर ३८४० फुटीवर फिलिप राजाने बांधिले येथील राजवाडा फारच उत्कृष्ट आहे

**इलिनोयस्**(न स) उ अमे युनतेदस्तेत म थे ही फार खोल असल्या कारणाने इच्यात मोटाली गलबते चालतात या नावाचे स यात कोळसा, लोखंड, तांबे, जस्त पुष्कळ सापडते

**इवनोख** (स) यू खं रशियांत

**इविकर** (ब) हि म इ त्रावणकोरचे राज्यात येथे मिरी, वेलची, सुंठ, इमारती लांकूड याचा व्यापार चालतो

**इविसा** (बे) यू ख दक्षि भूमध्य समुद्रात बालिआरिक बेटाचे समुदायात

**इवेल** (न) यू ख इंग्लंदात बेडफोर्डमध्ये

**इवोरा** (श) यू ख पोर्तुगाल देशात अलमत्तेजो प्रांतात.

**इशापूर** (श) हि ब इ कलकत्त्या जवळ हुगळी नदीवर.

**इशीम** (न) आशि रु तार्तरान तोबोल्स्क श जवळ ईतिश नदीस मिळते २ याच नावाचे शहर याच नदी-वर आहे

**इसर** (न) यू रु जर्मनींत असून दान्युब नदीस मिळते

**इसराना** (गा) हिं वाय प्रा पानिपत जवळ

**इस्कंदरून** (अखा) आशि ख तुर्कस्तानात लिबानन पर्वताजवळ भूमध्यसमुद्राचे काठीं

**इस्कार्दो** (श) आशि ख तिबेटाची प्राचीन राजधानी

**इस्कोंदा** (श) हि पजा इ बालिस्तान परगण्यात

**इस्ट रुमोलिया** (प्रा) यू ख तुर्कस्तानात [पल ह्मणतात.

**इस्तंबूल** (श) यू ख तुर्कस्तानची राज यास कानस्तातिनो-

**इस्तर** (बे) आस्ट्रालिया बेटात पोलिनिशीया बेटात [नखपा होतें

**इस्पाहन** (श) आशि रु इराणची प्राचीन राजधानी येथे कि-

**इस्लामकोट.** (गा) हि. मु इ कच्छ प्रातात. या नावाचा किल्ला

**इस्लामगड (नहर)** (कि) हि राज भावलपुरच्या किल्ल्याचे नाव

**इस्लामपूर** (गा) हिं मु इ सातारा जि कऱ्हाड पा ८ कोसावर.

**इस्लामनगर** (श) हिं वाय प्रा २ बगाल इला मोंगीर प्रातात.

**इस्लामाबाद** (श) हि काश्मिरात झेलम नदीच्या काठीं

**इसेक्स** (प्रा) यू ख. इग्लदात पूर्वेकडील प्रात

**इसोन** (न) यू ख फ्रासात सोन नदीस मिळते.

**इहंग** (श) हिं प प्रा दुआबात

**इहभर** (श.) हि. प इ लाहोर शहरापासून ३८ मैल

ईखस्टाट (श.) यू ख तुर्कस्थानात बवेरियात
ईजर (पर्व न) यू ग स्वित्सर्लंद मध्ये अल्प्स पर्वतापैकीं एके ओळीचे नाव २ जर्मनींत बोहीमिया मधून वाहत जाऊन एल्ब नदीस मिळते
ईन्सीदेला (श) यू ख स्वित्सर्लंद मध्ये [६० मैलावर
ईबनस्टाक (श) यू ख जर्मनींत सास्सनी स. मध्ये ड्रेसदेन पा
ईशान्यकेप (भू) आशि ख रशियात सैबिरियाचें उत्तरेस
ईसलबेन (श) यू ख जर्मनींत साक्सनी स
ईसेनस्टाट (श) यू ख आस्त्रिया देशात हंगेरीचे पश्चिमेस.
ईसेनाक (श) यू ख जर्मनीमध्ये
इंदिआना (स) अमे ख युनैतेदस्तेतमध्ये
इंगलबरो (पर्व) यू ग इग्लंदात यार्कमध्ये
इंगळी (गा) हि मु इ कोल्हापूर स वडगाव ता.
इंग्लंद (दे बे) यु ख फ्रान्स देशाचे उत्तरेस स्कातलंद इग्लंद मिळून एक बेट
इंग्लिशचानल (खा) यू ख इंग्लंद व फ्रान्स याच्यामध्यें
इंग्लेयीगांव (श) हिं म इ निजामचे रा विजापुरा पा.८४ मैल.
इंजर्दी (डो) हिं मध्यप्रा गोंडवणात बैतुलाजवळ.
इंजिली (गा) हि म इ गंजाम प्रा
इंजेमूर (श) हि म इ नेलोर जि
इंडी (श) हि मु इ विजापूर जि ता
इंदर (न) यू ख फ्रान्समध्ये लायर नदीस मिळते
इंदापुर (श) हि मु इ पुणे जि ता भिमेच्या काठीं
इंदारम (श) हिं मध्यप्रा नागपूर नि वेनगंगानदीवर

**इंदालस** (न) यू र म्नीदनमधून निघून बालतिक समुद्रास [मिळते
**इंदिअनचायना** (दे) आशि ख पूर्वेकडील द्वीपकल्प
**इंदिअनतेरितरी** (प्रा) अमे स स्वतंत्र संस्थानचा भाग
**इंदिआना** (स) अमे य युनैतेदस्तेदमध्ये
**इंदूर** (श) हि मध्यप्रा कुतकी नदीचे काठीं होळकराचे मुख्य शहर येथे लाखेचे चुडे चांदीच्या तारेचे काम [वर्णनीय होते
**इंदे** (गा) हिं मु इ ठाणे जि मुरबाड ता
**इंदोली** (म) हिं मु इ सातारा जि
**इंद्रगड** (श) हिं वाय प्रा फरकाबाद जि २ बुंदेलखडात
**इंद्रप्रस्थ** (श) हि प इ दिल्लीशहरास ह्मणतात
**इंद्रायणी** (न) हि मु इ पुणे जि बोरघाटातून निघून तुळजापुराजवळ भिमेला मिळते
**इंद्रावती** (न) हि मध्यप्रा गोदावरीस मिळते २ अयोध्याप्रा भागीरथीस मिळते [संगमावर
**इंद्रिसा** (गा) हि प इ बियास व सतल्ज ह्या नद्याच्या

## उ.

**उकली** (श) हिं मु इ सोलापूर जि सोलापूर पा ६६ मैल
**उकिमथ** (श) हि उत्तरेस कमाऊन प्रांतात मंदाकिनी नदीवर.
**उगा** (श) आशि र चिनईतार्तरींत मंगोलियात
**उगापुर** (श) हि वाय प्रा मिरझापूर जि असून मिरझापूर
**उगांव** (गा) हि मु इ नाशिक जि निफाड ता [पा १० मैल
**उचीतगड** (कि) हिं मु इ उत्तरकोंकणात [पश्चि ४२ मै
**उजकी चौकी** (श) हि वाय प्रा मिरझापुर जि कासीहून
**उजीअनी** (ग) हि वाय प्रा इटावा जि.

**उज्जनी (अवंतीका)** (श) हि माळवा प्रा क्षिप्रानदीचे काठीं शिंद्याचे शहर येथे महाकाळेश्वर म्हणून प्रसिद्ध देवस्थान आहे एका मैलावर विक्रमाची अवती नामक राजधानी आहे

**उझनी** (श) हि वाय प्रा बुदाव जि

**उडगांव** (श) हि ब इ बकापूर जि कलकत्त्याहून८७ मैल

**उतनाई** (न) हि मु इ ठाणे जि जव्हार स

**उत्कल** (दे) हि ब इ ओढिया प्रांताचे पूर्वीचे नाव

**उत्कामन** (पर्व शि) हिं म इ निळगिरी पर्वताचे शिखर उत्तम हवेचे ठिकाण येथे म इ गवर्नर राहतात

**उत्तन** (गा) हि मु इ ठाणे जि साष्टी ता

**उत्तरअर्काट** (प्रा) हिं म इ कर्नाटकात

**उत्तरकानडा** (प्रा) हिं मु इ द महाराष्ट्र देशात जि

**उत्तरकुरु** (प्रा) हि प इ पानिपतचा उ भाग

**उत्तरकोंकण** (प्रा) हि मु इ सह्याद्रि पर्वताचे पश्चिमेकडील प्रदेशात उत्तर कोंकण हा एक भागआहे यात ठाणे व कुलाबा हे जि व मुंबई हीं आहेत

**उत्तरतिवरा** (गा) हि मु इ रत्नागिरी जि चिपळूण ता

**उत्तरधार** (पर्व) हि मु इ कच्छ प्रा [नेल्लोर शहर

**उत्तरपनार** (न) हिं म इ बंगालच्या उपसागरास मिळते काठीं

**उत्तरमहासागर** (समु) आशि व यू ख उत्तरेस उत्तरध्रुवा सभोंवतीं

**उत्तरमांड** (न) हिं मु इ सातारा जि कऱ्हाड ता शिवड्या जवळ कृष्णेस मिळते

**उत्तरसमुद्र** (समु) यू ख इंग्लंद, जर्मनी व देन्मार्क ह्या देशामध्ये.

उत्तरसरकार (प्रा) हिं म इ गतूर पा उत्तरेस गजामपर्यंत समुद्रकिनाऱ्याचा भाग
उत्तरस्वीदन (दे) यू स्व स्वीदन देशाच्या उत्तरेकडचा भाग
उत्तूर (गा) हि मु इ कोल्हापूर स आजरे ता
उत्राण (गा) हि मु इ खानदेश जि येरडोल ता
उत्रेक्त (श) यू स हालदात विद्यालयाकरिता प्रसिद्ध
उदगांव (गा) हि मु इ कोल्हापूर स शिरोळे पेट्यात
उदतपूर (श) हि वाय प्रा कानपर जि कानपुर पा २०
उदपूर (गा) हि मु इ गुजरायेत [मेलावर
उदेपूर छोटा (प्रा) हि मु इ गुजरायेत रेवाकाठा प्रातात
उदगीर (गा) हि म इ निजामचे राज्यात माजरा नदीचे काठी येथे पेशवे व निजाम ह्याची इ स
उदरगांव (श) हि मु इ सोलापूर जि [१७६०तलढाई
उदामाची पेट (श) आफ्रिका स अबिसीनियात
उदरपिदुग (श) हिं म इ बल्लारी प्रातात
उदिपुर (श) हि राज विकानेर स [१५ मैल लाब आहे
उदीपूर (गा) हि राज सेकावती स या गावाजवळ भागोराघाट
उदुंग (गा) आशि स्व पूर्वकडील द्वीपकल्पात कंबोज देशात
उदेपूर(मेवाड) (स. श) हि राज स हे शहर उदेसिंग याने वसविले २ छोटानागपूर प्रातात स ३ नागपुराजवळ गाव
उदेपुरा (श) हि वाय प्रा गाझिपुर नि
उदेरामसर (श) हि राज विकानेर स
उधनाल (श) हि ब. इ कलकत्ता जि

**उनापदेव** (गा) हिं मु इ खानदेश जि चोपडे ता येथे या नावाचे उन्हाळे असून दुसरी सुनपदेव, निझरदेव अशी दोन उन्हाळी आहेत

**उना** (श) हिं मु इ काठेवाडात पोरबदरापासून ९६ मैल.

**उनाम (व)** (श) हिं अयोध्या प्रा जि

**उनिआरा** (श) हिं राज जयपुर स जयपुरा पा ३० मैल

**उप (फिश)** (न) आफ्रि स द आफ्रिकेतून निघून अट्लांटिक महासागरास मिळते

**उपळाई** (गा) हिं मु इ सोलापूर जि माढे ता [मैलावर

**उपीनगंडी** (गा) हिं म इ कानडा प्रातात मगलूरचे पूर्वेस ३०

**उप्साला** (श) यू ख स्वीदनात विद्यालयाकरिता प्रसिद्ध

**उबरगांव** (गा) हिं मु इ ठाणे जि पेटा २ या नावाची खाडी

**उबरो** (श) हिं मु इ सिंध प्रा शिकारपुर जि तालुका व

**उबरोली** (गा) हिं मु इ ठाणे जि माहिम ता [शहर

**उब्सानोर** (सरो) आशि ख चिनईतार्तरीत

**उर्बान्स्क** (सरो) आशि ख रुस्देशात सैबेरियात

**उभ्या** (न) यू ख बालतिक समु मिळते

**उमगड** (गा) हिं वाय प्रा आलगडाहून ३४ मैलावर

**उमडी** (श) हिं मु इ सातारा जि

**उमरकीर** (श) हिं निजामाचे राज्यात पैनगगा नदीवर

**उमरकोट** (श) हिं मु इ सिंध प्रां येथे अकबर बादशाहा जन्मला बनात व गालीचे चागले होतात

**उमरखेडे** (गा) हिं वऱ्हाड प्रा वासीम जि

**उमरेट** (गा) हिं मु इ गुज प्रा. खेडा जि ठासरा तालुक्यात

**उमरारी** (श) हि वाय प्रा फत्तगडपासून १४ मेल

**उमराव** (श) हि वाय प्रा शहाजहानपुर जि [ठिकाण

**उमरावती** (श) हि वऱ्हाडात व्यापाराचे मोठे शहर असून जि

**उमरी** (श) हि वाय प्रा अलाहाबादेपा ९ मेल [मैल

**उमरीत** (श) हि मु इ गुजराथ प्रा खेडा जि खेड्याहून ३२

**उमरेअर** (श) हि नागपुर प्रा येथे लोखंड सापडते

**उमरेट** (गा) हि नागपुर जि येथे रेशिमकाठी धोतरजोडे चा

**उमरेत** (गा) हि मध्य प्रा छिंदवाडा जि [गले तयार होतात

**उमरी** (श) हि वाय प्रा मिनपुरी जि [उत्तम होतात

**उमलीपट्टी** (श) हि वाय प्रा अजिमगड जि येथे काशाची भांडीं

**उरबातेहेरी** (स) हि राज उत्तरेस, बुंदेल ख काल्पीहून १०० मै

**उरण** (पे) हि मु इ कुलाबा जि पेटा आहे येथे मिठाचे फार
उत्पन्न होते २ या नावाची खाडी

**उरमोडी** (न) हि मु इ सातारा नि कऱ्हाडला कृष्णेस मिळते

**उरळी** (गा) हि मु इ पुणे जि

**उराघम** (गा) हि म इ कोचीन स त्रिचूर पा ६ मेल

**उराल** (पर्व न) आशि ख पश्चि व आशि व यू ह्यामध्ये २ या
नावाची नदी

**उरुगुवाय** (न) द अमे रिओलाप्लाता खाडीस मिळते

**उरूमिया** (सरो) आशि ख इराणात याचे पाणी खारे व जड म्ह.
मासे वाचत नाहीं २ या नावाचे शहर

**उर्चाकितहेरी**(स.) हि वाय प्रा बुंदेल ख बटवा नदीचे काठीं.

**उर्णावती** (न) हि मु. इ. खानदेश जि. शिरपुर ता

उलपाड (श ) हि मु इ गुज प्रा सुरत जिल्ह्यात ता
उला (श ) हि म इ निजामच राज्यात
उलूर (श ) हि म इ त्रावणकोर सस्थानात त्रिवेंद्रमचे उत्त[रेस ५ मैल
उलौती (न ) हि मु इ गुजरा थेत
उल्हास (न ) हिं मु इ कुलाबा जि कर्जत ता
उस्थळ (गा ) हि मु इ नाशिक जि पेठ ता
उळवे (गा व ) हिं मु इ कुलावा जि पनवेल ता
ऊख, (गा ) हि प इ दुआव प्रातात
ऊर्गा (गा ) आशि ख चिनई तार्तरीत
ऊचीरा (स ) हि मध्य प्रा नर्मदेच्या काठी
ऊज (न ) यू ख इंग्लदात वेल्समध्ये
ऊदुंग (श ) हि पू ब्रह्मदे कानोजाची राज
ऊदपी (गा ) हि म इ दक्षिण कानडा प्रा येथे तादूळ फार
विकतात व देवळे पुष्कळ आहेत
उंच्छा (न ) हिं मु इ गुज प्रा गायकवाडचे राज्यात
उंचाडगांव (गा ) हि मध्य प्रा शिंद्याचे राज्यात उज्जनीपा ५२
मैल
उंद्राकोंडा (श ) हि म इ निजामचे रा हैदराबादेच्या पूर्वेस
उंबरगाव (गा ) हि मु इ ठाणे जि डाहाणू ता पेटा
उंबराणे (गा ) हि मु इ नाशिक जि मालेगाव ता
उंब्दानुल्ला (न ) हि व इ भागलपूर जि भागीरथीस मिळते
उंब्रज (गा ) हि मु इ सातारा जि कऱ्हाड ता १२ मैल

ऋ

ऋषीकुले (न ) हिं म इ गंजाम प्रा निघून बंगालच्या उपसाग
रास मिळते

## ए

**एकर** (ब.) आशि ख तुर्कस्थानात पालस्तैन प्रा भूमध्य-समु काठीं

**एकलहरें** (गा ) हिं मु इ नगर जि भिंगार गावाजवळ

**एक्झिटर** (श ) यू ख इंग्लदात डेव्हन शायर प्रातात एक्स नदीवर फार मोठे शहर [दक्षिस प्रा

**एक्स** (न ) यू ख इग्लदात डेव्हशायर प्रा २ स्कातलदात

**एक्सबीज** (गा ) यू ख जर्मनात कसेल शहराजवळ २३ मैला-वर येथे तागाचे व लोकरीचे कारखाने आहेत

**एक्समुर** (प्रदे ) यू ख इग्लदात सामरसेट शायर प्रा. उचवस्या-

**एकापिला** (गा) हि म इ नेलूर येथे मीठ चागले होते [चा प्रदेश

**एखतपुर** (गा ) हि मु इ पुणे जि पुरदर ता

**एजिहील** (प्रदे ) यू ख इग्लदात वारविक शायर प्रातात

**एटन** (श ) यू ख इग्लद दे विद्यालयाकरिता प्रसिद्ध

**एडिंबरो** (श ) यू ख स्कातलदात मुख्य शहर

**एडोव्हा** (श ) हि म इ मलबार किनाऱ्यावर

**एना** (ज्वा पर्व ) यू ख सिसिली बेटात, उ १०८७४ फूट

**एत्रिक** (न ) यू ख स्कातलदात अवरफर्ड शहराजवळ त्वीद नदीस मिळते

**एथीजा** (श ) यू ख स्पेनात अदालुशिया प्रा [ काठीं

**एदलाबाद** (गा ) हिं मु इ खानदेश जि भुसावळ ता पूर्णानदीचे

**एदेन** (न ) यू ख इग्लदात वेस्तमोर्लंद शायर प्रातान २ स्कातलदात फैफ शायर प्रातात त्वीद नदीस केल्सोजवळ मिळते

**एनडेव्हर** (सामु) आ ख आस्त्रेलियाचे उत्तरेस तारीस सामु. जाण्याची वाट २ आस्त्रेलियात नदी

**एर्न** (स) यू ख आयर्लंदात

**एन्स** (न) यू ख आस्त्रियात अल्पस पर्व पा निघून [दान्यूब नदीस मिळते

**एनारा** (सरो) यू ख. रूसदेशात

**एनिस्कार्थी** (श) यू ख आयर्लंदात वेक्सफोर्ड प्रातात [राजधानी

**एनिस्किलेन** (श) यू ख आयर्लंदातील अर्न नदीतील बेटाची

**एपरीज** (गा) यू ख आस्त्रियात हंगेरीप्रातात

**एपवर्थ** (गा) यू ख इंग्लंदात लिंकन पा० २३ मैलावर.

**एपिनल** (गा) यू ख फ्रान्स देशात मासेल नदीवर येथे लोखंड, पितळ व नकशीचे काम चागले होतें

**एफिसुस** (श) आशि ख आशियामैनरमध्ये

**एबोरा** (श) यू ख पोर्तुगाल देशात

**एब्रो** (न) यू ख स्पेनात भूमध्य समु मिळते.

**एम्** (गा) आशि ख द आस्त्रेलियामध्ये न्यूसौथवेल्स प्रातात सिडनीजवळ २ वासच्या सामुद्रधुनीत वान्डिमन्सलंडमध्ये अखात

**एमडन** . (ब) यू ख जर्मनींत हानोवर प्रातात एम्स नदीच्या मुखाजवळ

**एमपली** (गा) यू ख इतालीमध्ये टस्कनी प्रातात आर्नोनदीवर

**एमरने** (गा) यू ख. फ्रान्स देशात मार्न नदीवर येथें शापेन दारू चागली होते

**एम्स** (न.) यू ख जर्मनींत हानोवर प्रातात

**एम्सवर्थ** (गा) यू ख. इंग्लदात हाट्स प्रातात पोर्टमौथजवळ.

**एमीयन्स** (श ) यू स फ्रान्सात
**एरनग्रे** (गा ) यू ग्र इंग्लंदात दक्षिस शहराजवळ
**एरी** (सरो ) अमे ख उत्त अमे कानडा प्रांतात
**एरीबस** (ज्वा प ) अमे ख द अमेरिकेत पातागोनिया द उंची १२ हजार फूट
**एरीवान** (श ) आशि ख ट्रान्सकाकेशियात [होतात
**एरंडोल** (श ) हिं मु इ खानदेश जि ता येथे देशी कागद
**एल्बिंग** (न) यू ख प्रशियात
**एलबुर्ज** (पर्व ) आशि ख कास्पियन समुद्राचे काठा
**एला** (श ) यू ख प्रशियात
**एल्लापुर** (श ) हिं मु इ कारवार जि ता
**एलाशापेल** (श ) यू ख प्रशियात शहर इ स १७४८ त तह झाला येथे सहा उष्ण पाण्याचे झरे आहेत
**एलिचपूर** (श ) हिं वऱ्हाड प्रां जि चे ठिकाण
**एलिफंटा** (बे ) हिं मु इ मुंबईजवळ
**एलिफांत** (न ) आफ्रि ख पूर्व आफ्रिकेत नदी असून ती मोझांबिकच्या खाडीस मिळते
**एलूर** (गा ) हिं मु इ. सातारा जि वाळवे ता [जवळ
**एलोर** (गा ) हिं म इ उत्तर सर्कार्स प्रां कोलेर सरोवरा-
**एल्ब** (न) यू ख जर्मनीतून निघून बाल्तिक समुद्रास मिळते
**एल्वस** (श )यू ख पोर्तुगाल देशात तटबंदीचे शहर
**एल्सिनूर** (ब) यू ख देन्मार्कात झिलाडबेटात सौंद सामुद्रधुनीवर
**एवरेस्त** (शिख ) हि. हिमालय पर्वताचे शिखर उंची, २९००२ फूट

**एविशाम** (ग) यू ग इंग्लंदात वूर्स्टर जवळ १४ मैलावर ॲव्हन नदीवर
**एव्रोरा** (ग) यू ख पोर्तुगाल दे
**एसणे** (गा) आफ्रि ख नैल नदीच्या काठी
**एसिकिबो** (न) द अम ग गायना देशात अतलांतिक महासागरास मिळते
**एस्त्रिमादुरा** (प्रा) यू ख स्पेनमध्ये याचे बाडेजाज व कासेरीस असे २ भाग आहेत २ पोर्तुगालमध्ये
**एस्तुरिआ** (पर्व) यू ग स्पेन दे
**एस्रेला** (पर्व) यू ख पोर्तुगालमध्ये
**एंघीन** (गा) यू ख बेल्जममध्ये हेनाल्ट प्रा
**एंजिली** (बं ग) आशि ख इराणात काम्पियन समुद्राचे काठी.
**एंबख** (न) यू ख रशियात पिपस सरोवरास मिळते.
**एंब्रन** (न) यू ख फ्रान्समध्ये आल्पस पर्वतातून निघाली
**एबा** (न) आशि ख स्वतंत्र तार्तरीमध्ये
**ऐझर** (न) यू ख जर्मनी दे. बवेरिया स
**ऐनवडें** (गा) हि मु इ सातारा जि वाळवे ता
**ऐनपूर** (गा) हि मध्यप्रा नेमाड जि बऱ्हाणपूर ता
**ऐरवास** (कि) हि माळव्यात होळकराचे राज्यात
**ऐरिस** (समु) यू ख इंग्लंद आणि अयर्लंद ह्यामध्ये
**ऐलआफ बैन** (बे) यू ख ऐरिश समुद्रात
**ऐलआफमान** (बे) यू ख ऐरिश समुद्रात. [सरोवर
**ऐलंद** (बे) अमे ख. स्वतंत्र स. च्या दक्षिणेस २आस्त्रेलियात
**ऐस्लांद** (बे) यू ख. अतलांतिक महासागरात देन्मार्कच्या ताब्यात.

